**कोल्हापूर चित्रनगरी महामंडळाचा दैनंदिन खर्च भागविण्याकरीता व्यवस्थापन अनुदान उपलब्ध करुन देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : कोचिन-२०२२/प्र.क्र.८५/सां.का.१**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय (विस्तार), मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ३० मार्च, २०२३

वाचा : १) व्यवस्थापकीय संचालक, कोल्हापूर चित्रनगरी महामंडळ, यांचे क्रमांक कोचिन-२०२३/४५६, दि.२४.०१.२०२३ चे पत्र.
२) शासन ज्ञापन, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्रमांक पुनर्वि-२०२३/ प्र.क्र.३६/सां.का.१, दि.३०.०३.२०२३

**प्रस्तावना :**

कोल्हापूर चित्रनगरी महामंडळास व्यवस्थापन अनुदान (२२०५ ३३६८) ३५, भांडवली मत्तेच्या निर्मितीकरीता अनुदान या लेखाशीर्षाखाली सन २०२२-२३ या वित्तीय वर्षात रु.५०.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पित असून, सुधारित अंदाजाच्या मर्यादेत उपलब्ध असलेला रु.३५.०० लक्ष (रुपये पस्तीस लक्ष फक्त) व संदर्भ क्र.२ च्या शासन ज्ञापनान्वये पुनर्विनियोजनाद्वारे प्राप्त झालेला रु.१५.०० लक्ष असा एकूण रु.५०.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणाली (BEAMS) वर उपलब्ध आहे. सन २०२२-२३ या वित्तीय वर्षात महामंडळाचा दैनंदिन खर्च भागविण्यासाठी व्यवस्थापन अनुदान वितरीत करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

सन २०२२-२३ या वित्तीय वर्षात कोल्हापूर चित्रनगरी महामंडळास त्यांचा दैनंदिन खर्च भागविण्यासाठी व्यवस्थापन अनुदानाप्रित्यर्थ रु.५०,००,०००/- (रुपये पन्नास लक्ष फक्त) इतका निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधीबाबतचे बाबवार उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

३. या प्रयोजनासाठी उप सचिव (सांस्कृतिक कार्य), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून, अवर सचिव (रोख शाखा), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी व्यवस्थापकीय संचालक, कोल्हापूर चित्रनगरी महामंडळ मर्यादित, कोल्हापूर यांना सदर रक्कम एकरकमी वितरीत करावी.

४. या प्रित्यर्थ होणारा खर्च मागणी क्र. झेडडी-२, २२०५, कला व संस्कृती (००) १०२, कला व संस्कृती प्रचालन, (०१) शासकीय प्रेक्षागृहे व सभागृहे, (०१) (०५) कोल्हापूर चित्रनगरी महामंडळास व्यवस्थापन अनुदान (२२०५ ३३६८) ३५, भांडवली मत्तेच्या निर्मितीकरिता अनुदान या लेखाशीर्षाखाली सन २०२२-२३ या आर्थिक वर्षातील उपलब्ध व संदर्भ क्र.२ च्या शासन ज्ञापनान्वये पुनर्विनियोजनाद्वारे प्राप्त झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**५.** हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने आणि वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१३६/व्यय-१५, दि.२८.०३.२०२३ व क्र.१९२/२०२३/व्यय-१५, दि.३०.०३.२०२३ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**६.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक क्रमांक २०२३०३२९१७०८४८८४२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIDYA HEMANT WAGHMARE

Digitally signed by VIDYA HEMANT WAGHMARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=4e214bf8a250420c28c2084d8dd965c0d454568322bd41981d48971712e51795, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F93EFE7B946BF26FF989D6E5E01E1B122B9EB4E3E4E6799CB8E82B2D33D58DFC, cn=VIDYA HEMANT WAGHMARE
Date: 2023.03.31 11:25:48 +05'30'

**( विद्या वाघमारे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव, सांस्कृतिक कार्य यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
३. उप सचिव, सांस्कृतिक कार्य यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
४. व्यवस्थापकीय संचालक, कोल्हापूर चित्रनगरी महामंडळ मर्यादित, कोल्हापूर
५. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता )-१, महाराष्ट्र, मुंबई
६. महालेखापाल ( लेखापरीक्षा )-१, महाराष्ट्र, मुंबई
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
९. वित्त विभाग (सा.उ. /व्यय-१५/अर्थसंकल्प-११), मंत्रालय, मुंबई
१०.अवर सचिव (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
(यांना उक्त अनुदानाची रक्कम BDS द्वारे उपलब्ध करुन देण्यासंदर्भातील कार्यवाहीसाठी अग्रेषित)
११.अवर सचिव (रोख शाखा), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१२.निवड नस्ती (सां.का.१).